सन २०१८-१९ च्या टंचाई कालावधीत ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत. (आर्थिक वर्ष २०१९-२०)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१९/प्र.क्र. १३१/पापु-१४**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः ०३ मार्च, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९
३) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. १९१/पापु-१४, दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८
४) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्रमांक: मशा/कार्या-६/नै.आ/टंचाई उपाययोजना /२०१९, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१९
५) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्रमांक: ससंता/पाणी टंचाई/अनुदान मागणी/६०६/२०१९, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१९
६) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्रमांक: निधीमा/२०१९/प्र.क्र.०४/तामे २३(३)/१३३८, दिनांक २७ जानेवारी, २०२०
७) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक: जा.क्र. २०२०/महसूल/नै.आ/पाटं/कावि-१८१, दिनांक २३ जानेवारी, २०२०
८) जिल्हाधिकारी, रत्नागिरी, ससाशा/कार्या-२/निधी मागणी/२०१९, दिनांक १०.१०.२०१९
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग, क्रमांक : सिंजिप/ग्रापापुवि/पाणी टंचाई/तांशा-२/२७६५/२०, दिनांक २६.०२.२०२०
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर क्रमांक : जिपसो/ग्रापापु/लेखा-०३/२०२० दिनांक ०४.०२.२०२०

११) शासन निर्णय, महसूल व वन विभाग विभाग क्रमांक: एससीवाय-०६/२०१९/प्र.क्र.४०/म-११, दिनांक १९ जून, २०१९, दि. ३० ऑक्टोबर, २०१९ व दि. २५.०२.२०२०

१२) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग विभाग क्रमांक: टंचाई २०१९/प्र.क्र. १३१/पापु-१४, दिनांक २० जून, २०१९, दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९, दिनांक २२ ऑगस्ट, २०१९ दि. २ नोव्हेंबर, २०१९ व दिनांक ०३ डिसेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

राज्यातील ग्रामीण व नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च “२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य” या लेखाशीर्षाखाली महसूल व वन विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २०१८-१९ च्या टंचाई कालावधीत केलेल्या / करावयाच्या उपायोजनांसाठी संदर्भ क्र. ४ ते १० मधील पत्रान्वये निधी मागणीचा प्रस्ताव या विभागास प्राप्त झाला आहे. सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता महसूल व वन (मदत व पुनर्वसन ) विभागाने त्यांच्या संदर्भाधीन क्रमांक- ११ च्या शासन निर्णयाद्वारे या विभागाकडे वितरीत केलेल्या निधीमधून विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद यांनी मागणी केलेल्या निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक व औरंगाबाद यांना त्यांच्या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च लेखाशिर्ष २२४५ २१८५ **अंतर्गत रुपये ३१८४.०५ लाख (अक्षरी एकतीस कोटी चौ-याऐंशी लाख पाच हजार फक्त)** इतका निधी प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक व औरंगाबाद, यांनी ग्रामीण भागातील टंचाई अंतर्गत उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना थेट वितरीत करण्यात यावा.

२) ज्या नागरी उपाययोजना महानगरपालिका /नगरपरिषद यांचे मार्फत राबविण्यात येत आहे. त्याकरिता विभागीय आयुक्त यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. जिल्हाधिकारी

यांनी सदर निधी संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांना वितरीत करावा.

३) सन २०१८-१९ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा. अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) विभागीय आयुक्त यांनी निधी प्राधान्याने विहिर अधिग्रहण, टँकरने पाणी पुरवठा करणे या उपाययोजनांना वितरीत करावा तसेच विभागीय आयुक्त यांनी सादर केलेल्या प्रस्तावात जरी शासन स्तरावरुन मान्यता देण्यात आलेल्या उपाययोजनांसाठीची मागणी केली नसली तरी या उपाययोजनांना सुध्दा संबंधित प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार कामाच्या प्रमाणात प्राधान्याने निधी वितरित करण्यात यावा.

५) सदर निधी सन २०१८-१९ या टंचाई कालावधीतील ( माहे ऑक्टोबर, २०१८ ते सप्टेंबर, २०१९) राबविलेल्या उपाययोजनांसाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. सदर निधीमधून प्राथम्याने माहे मार्च, २०१९ पूर्वीची देयके पूर्णत: अदा करावीत. उर्वरित निधी ( कालावधीनिहाय पुढील कामांसाठी खर्ची टाकण्यात यावा ). त्यानुसार उपलब्ध निधीचे विनियोजन करावे.

६) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

७) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

८) ज्या नागरी तथा ग्रामीण उपाययोजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येत आहेत, त्या उपाययोजनांसाठीचा निधी जिल्हा परिषदेकडे वितरीत करण्यात येऊ नये. सदर निधी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी योजना राबविणाऱ्या संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचेकडे तात्काळ वितरीत करावा. तसेच ज्या उपाययोजना महानगरपालिका / नगरपरिषद यांचे मार्फत राबविण्यात येत आहेत, त्यांचेकरिता जिल्हाधिकाऱ्यांनी सदर निधी संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडे वितरीत करावा.

९) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी

किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार याची नोंद घेण्यात यावी.

१०) **सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये.**

ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

११) सदर निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे.तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदर निधीच्या पूर्ण रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे तातडीने सादर करावीत.

१२) याबाबत होणारा खर्च "मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९२)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९२) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (अनिवार्य) ३१ सहाय्यक अनुदाने

(वेतनेत्तर) (२२४५ २१८५)" या लेखाशीर्षांखाली उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

१३) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र | विभागीय आयुक्त | जिल्हा | वाटप करावयाची रक्कम (रक्कम रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | कोकण | रत्नागिरी | ६६.४३ |
| | | सिंधुदुर्ग | १००.०० |
| | | **एकूण कोकण विभाग** | **१६६.४३** |
| २ | नाशिक | जळगाव | ९४२.६३ |
| | | नंदुरबार | १७४.९९ |
| | | **एकूण नाशिक विभाग** | **१११७.६२** |
| ३ | पुणे | सांगली | ३००.०० |
| | | सोलापूर | ७५०.०० |
| | | **एकूण पुणे विभाग** | **१०५०.००** |
| ४ | औरंगाबाद | जालना | ८५०.०० |
| | | **एकूण औरंगाबाद विभाग** | **८५०.००** |
| | | **एकूण** | **३१८४.०५** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३०२१५३७५८१७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=Water supply & Sanitation, postalCode=400032, st=Manipur, 2.5.4.20=2a611aa6775332ae4fb220e8dd3ec11f80d6b95fec14b729156665cff860b06b, cn=Mahendra Babusing Hajari
Date: 2020.03.03 18:39:02 +05'30'

**(महेंद्र हजारी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
७) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
८) महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
९) महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, जळगाव, नंदुरबार, सांगली, सोलापूर व जालना
१२) विभागीय आयुक्त, कोंकण, नाशिक, पुणे व औरंगाबाद
१३) जिल्हाधिकारी, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, जळगाव, नंदुरबार, सांगली, सोलापूर व जालना
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, जळगाव, नंदुरबार, सांगली, सोलापूर व जालना.
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, जळगाव, नंदुरबार, सांगली, सोलापूर व जालना
१६) मुख्याधिकारी (सर्व )
१७) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१८) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१९) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२०) सह सचिव (पापु-१४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२१) निवडनस्ती पापु-१४.